**लातूर शहर महानगरपालिकेतील शहर अभियंता या रिक्त पदावर श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ यांच्या प्रतिनियुक्तीने केलेल्या नियुक्तीस मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- लामपा-२०२२/प्र.क्र.१९/नवि-२४**

४ था मजला (मुख्य इमारत), मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
राजगुरू हुतात्मा चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-७ जून, २०२४

**वाचा:-** १) या विभागाचा समक्रमांकाचा दि.२९ मार्च, २०२२ रोजीचा शासन निर्णय.
२) या विभागाचा समक्रमांकाचा दि.१७ एप्रिल, २०२३ रोजीचा शासन निर्णय.
३) आयुक्त तथा प्रशासक, लातूर शहर महानगरपालिका यांचे पत्र जा.क्र.लाशमनपा/सामान्य प्रशासन विभाग/काvि-१८५०/२०२४, दि.०७ मार्च, २०२४

**प्रस्तावना:-**

लातूर शहर महानगरपालिकेकरीता एकूण १२४६ पदांचा आकृतीबंध दिनांक २८ मे, २०१३ रोजी च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. दि.१९ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या लातूर शहर महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण ) नियम, २०१९ च्या नियम क्र.९ नुसार "शहर अभियंता" हे पद १०० टक्के पदोन्नतीचे असून योग्य अधिकारी उपलब्ध होईपर्यंत प्रतिनियुक्तीने भरण्याची तरतूद उपलब्ध आहे.

०२. त्यानुसार, श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ यांची संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये लातूर शहर महानगरपालिकेत "शहर अभियंता" या पदावर प्रतिनियुक्तीने एक वर्षाच्या कालावधीकरिता नियुक्ती करण्यात आली होती. सदर प्रतिनियुक्तीस संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये पुढील एक वर्षाच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली होती. श्री. केंद्रे यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक २९ मार्च, २०२४ रोजी संपुष्टात आला आहे.

०३. आयुक्त तथा प्रशासक, लातूर शहर महानगरपालिका यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये सद्यस्थितीत सदर पदावर पदोन्नतीने नियुक्त करण्यासाठी उमेदवार उपलब्ध नाही, राज्य शासनाच्या विविध योजने अंतर्गत मंजूर कामे महानगरपालिका क्षेत्रात सुरू असून सदर योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने महानगरपालिकेकडे सक्षम तांत्रिक अधिकारी उपलब्ध नसल्याने श्री.केंद्रे यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्यास सहमती दर्शविली आहे.

०४. आयुक्त तथा प्रशासक, लातूर शहर महानगरपालिका यांनी दिलेल्या सहमतीनुसार लातूर शहर महानगरपालिकेतील "शहर अभियंता" या पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत श्री.केंद्रे यांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

श्री. नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ यांच्या लातूर शहर महानगरपालिकेतील "शहर अभियंता" या पदावरील प्रतिनियुक्तीस दि.३० मार्च २०२४ पासून १ वर्ष म्हणजेच दि.२९ मार्च, २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. श्री. केंद्रे, यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्यासंदर्भात या विभागाद्वारे निर्गमित समक्रमांकीत शासन निर्णय दि.२९ मार्च, २०२२ मधील अटी व शर्ती कायम असतील.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६०७१६२६०८६१२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.07 16:39:44 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
२. श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ, नगरपरिषद प्रशासन शाखा, जिल्हाधिकारी कार्यालय, परभणी

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त तथा प्रशासक, लातूर शहर महानगरपालिका, लातूर.
३) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
४) निवड नस्ती, नवि-२४.